**आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षामध्ये अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना विविध स्पर्धा परीक्षा/परकीय विद्यापीठांमध्ये प्रवेशासाठीच्या अर्हताकारी परीक्षा/ परकीय भाषांचे प्रशिक्षण देणे या योजनेसाठी निधी वितरण (लेखाशिर्ष २२२५डी३८७)**

**महाराष्ट्र शासन**

**आदिवासी विकास विभाग**

शासन निर्णय क्रमांकः टिएसपी-२०२४/ प्र.क्र.**०२**/ कार्यासन-६

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक : २५ मार्च, २०२५.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि.०१.०४.२०२४.

२) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.२५.०७.२०२४, दि.१२.०२.२०२५ व दि.१७.०३.२०२५.

३) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे पत्र क्र.आसंप्रसं/स्पर्धा परीक्षा/२०२४-२५/का-०२/१००, दि.१३.०२.२०२५.

४) आदिवासी विकास विभाग नस्ती क्र.प्रशिक्षण-२०२४/प्र.क्र.११३/का-०९.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना विविध स्पर्धा परीक्षा/परकीय विद्यापीठांमध्ये प्रवेशासाठीच्या अर्हताकारी परीक्षा/परकीय भाषांचे प्रशिक्षण देणे या योजनेंतर्गत रु.३०.०० कोटी इतका निधी वितरणाचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र.४ अन्वये वित्त विभागास प्रस्ताव सादर करण्यात आला होता. सदर प्रस्तावास वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रम अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना विविध स्पर्धा परीक्षा/परकीय विद्यापीठांमध्ये प्रवेशासाठीच्या अर्हताकारी परीक्षा/परकीय भाषांचे प्रशिक्षण देणे या योजनेंतर्गत सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पित तरतुदींतून खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

**(रु. कोटीत)**

| **योजना** | **लेखाशीर्ष** | **बाब** | **सन २०२४-२५ साठी मंजूर सुधारीत अंदाज** | **यापूर्वी वितरीत निधी** | **सदर शा. नि. अन्वये वितरीत येत असलेली तरतूद** |
|---|---|---|---|---|---|
| **१** | **२** | **३** | **४** | **५** | **६** |
| अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना विविध स्पर्धा परीक्षा/परकीय विद्यापीठांमध्ये प्रवेशासाठीच्या अर्हताकारी परीक्षा/परकीय भाषांचे प्रशिक्षण देणे | २२२५ डी३८७ | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | १००.०० | ७०.०० | ३०.०० |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.३०.०० कोटी (अक्षरी रुपये तीस कोटी फक्त) इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे** यांना वितरीत करण्यास हरकत नसावी.

३. वितरीत निधीचा विनियोग करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ व २ येथील शासन परिपत्रकांतील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाने ई-ऑफिस क्र.९००९२७ वर, टिपणी क्र.५७-६३, दिनांक २०.०३.२०२५ अन्वये दिलेल्या मंजुरीस अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३२५१८५१०४०२२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJENDRA DEVARAM BHAWARI

Digitally signed by RAJENDRA DEVARAM BHAWARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=e2f5429d49742f96b79e4293421ba2dfa8a71cad3864b9b289879d173b67fcdc, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F617DED8E7182679ED107E63511160B2054D23D8173AD985E5B569A5802CEA5A, cn=RAJENDRA DEVARAM BHAWARI
Date: 2025.03.25 19:04:09 +05'30'

**( राजेंद्र दे. भवारी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव, आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.
५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९/ व्यय १४ ), मंत्रालय, मुंबई.
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. कार्यासन क्र. ९, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
९. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.